**राज्यात महिलांवरील अत्याचाराची प्रकरणे तातडीने निकाली काढण्यासाठी स्थापन करण्यात आलेल्या १४ विशेष न्यायालयातील अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्रमांक: विशेन्या १३१८/प्र.क्र.५६/का- नऊ**

मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.

दिनांक :-०३ ऑक्टोबर, २०१८.

**पहा-**

१) विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्र.विशेन्या १३१३/प्र.क्र.६९/नऊ, दि.१७.०१.२०१४

२) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, परभणी, यांचे पत्र जा.क्र./आस्था/ब-४/८६९३/२०१८, दि.०१.०८.२०१८

३) प्रमुख जिल्हा न्यायाधीश, नांदेड यांचे पत्र जा.क्र.ब-४(१०)/५८६२/२०१८, दि. ०२.०८.२०१८

४) प्रमुख जिल्हा न्यायाधीश, सोलापूर यांचे पत्र क्र. जा.क्र. आस्था/ब-४/८०९/२०१८, दि.०३.०८.२०१८

५) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, सातारा यांचे पत्र जा.क्र.बी.एडीएम/१५/७६२२/२०१८, दि. ०७.०८.२०१८

६) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, चंद्रपूर यांचे पत्र जा.क्र./प्रशासन/५००९/२०१८, दि. ०३.०८.२०१८

७) प्रभारी प्रमुख जिल्हा न्यायाधीश, उस्मानाबाद यांचे पत्र जा.क्र.काव्यवि/(प्रशा)५५५४, दि. ०८.०८.२०१८

८) प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, जालना यांचे पत्र जा.क्र./आस्था/७३३७/२०१८, दि.२६.०७.२०१८.

९) विधि व न्याय विभाग शासन निर्णय क्र. विशेन्या १३१८/प्र.क्र.५६/का-नऊ, दि. १६.०३.२०१८.

१०) वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.०८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८.

**प्रस्तावना :**

राज्यातील महिलांवरील अत्याचाराची प्रकरणे तातडीने निकाली काढण्यासाठी राज्यात संदर्भीय क्र.१ च्या शासन निर्णयानुसार १४ विशेष न्यायालये स्थापन करण्यात आली आहेत. सदर १४ विशेष न्यायालयातील एकूण ९९ अस्थायी पदांना संदर्भ क्र. ९ च्या शासन निर्णयान्वये दि.३०.०९.२०१८ पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर ९९ अस्थायी पदांना पुढील मुदतवाढ मिळणेबाबतचे प्रस्ताव शासनास प्राप्त झाले आहेत. संदर्भ क्र.१० येथील वित्त विभागाच्या शासन निर्णयान्वये दि.१.१०.२०१८ ते २८.०२.२०१९ पर्यंत अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले आहेत. त्यानुसार १४ विशेष न्यायालयातील एकूण ९९ अस्थायी पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

महिलांवरील अत्याचाराची प्रकरणे निकाली काढण्यासाठी नगर दिवाणी सत्र न्यायालय, बृहन्मुंबई, भंडारा, चंद्रपूर, धुळे, जालना, लातूर, नांदेड, नाशिक, उस्मानाबाद, परभणी, सांगली, सातारा, सोलापूर व वर्धा या १४ जिल्ह्यातील विशेष न्यायालयाच्या आस्थापनेवरील एकूण ९९ अस्थायी पदांना दि. ०१.१०.२०१८ ते दि. २८.०२.२०१९ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. नगर दिवाणी व सत्र न्यायालय, बृहन्मुंबई येथील विशेष न्यायालयाकरीता ८ पदे खालीलप्रमाणे आहेत.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या (१ न्यायालयासाठी) |
|---|---|---|
| १ | न्यायाधीश, नगर दिवाणी व सत्र न्यायालय | १ |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | १ |
| ३ | अधिक्षक/शिरस्तेदार | १ |
| ४ | दुभाषी | १ |
| ५ | लिपिक-टंकलेखक | २ |
| ६ | हवालदार | १ |
| ७ | शिपाई | १ |
| | एकूण पदे | ८ |

३. वरील प्रस्तावा अंतर्गत येणारा खर्च "जे-१, २०१४, न्यायदान (दत्तमत) १०५- दिवाणी व सत्र न्यायालये, (०१) (०१) मुंबई शहर दिवाणी व सत्र न्यायाधीश (०१) सांकेतांक क्रमांक (२०१४ ०१६३)" या शिर्षाखाली सन २०१८-२०१९ या वित्तीय वर्षासाठी मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. तसेच भंडारा, चंद्रपूर, धुळे, जालना, लातूर, नांदेड, नाशिक, उस्मानाबाद, परभणी, सांगली, सातारा, सोलापूर व वर्धा या १३ जिल्हयातील विशेष न्यायालयांकरिता प्रत्येकी ७ पदे पुढीलप्रमाणे आहेत.

| अ.क्र. | पदनाम | पदसंख्या (१ न्यायालयासाठी) | पदसंख्या (१३ न्यायालयासाठी) |
|---|---|---|---|
| १ | जिल्हा व सत्र न्यायाधीश | १ | १३ |
| २ | लघुलेखक (उच्च श्रेणी) | १ | १३ |
| ३ | अधिक्षक/शिरस्तेदार | १ | १३ |

| | | | |
|---|---|---|---|
| ४ | वरिष्ठ लिपिक | १ | १३ |
| ५ | कनिष्ठ लिपिक | १ | १३ |
| ६ | हवालदार | १ | १३ |
| ७ | शिपाई | १ | १३ |
| | एकूण पदे | ७ | ९१ |

५. वरील प्रस्तावा अंतर्गत येणारा खर्च " जे-१, २०१४, न्यायदान (दत्तमत) १०५- दिवाणी व सत्र न्यायालये, (०२) (०१) जिल्हा व सत्र न्यायाधीश, सांकेतांक क्रमांक (२०१४ ०१७२)" या शिर्षाखाली सन २०१८-१९ या वित्तीय वर्षासाठी मंजूर होणाऱ्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दि.०७.०९.२०१८ द्वारे प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार हा शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१८१००४११५४३०२७१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

Amogh Shyamkant Kaloti

Digitally signed by Amogh Shyamkant Kaloti
DN: CN = Amogh Shyamkant Kaloti, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Law and Judiciary Department
Date: 2018.10.04 11:59:58 +05'30'

**(अ. श्या. कलोती)**
**विधि सल्लागार-नि-सह सचिव**

**प्रति :-**

०१. मा.महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई,
०२. प्रधान न्यायाधीश, नगर दिवाणी सत्र न्यायालय, बृहन्मुंबई,
०३. प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, भंडारा, चंद्रपूर, धुळे, जालना, लातूर, नांदेड, नाशिक, उस्मानाबाद, परभणी, सांगली, सातारा, सोलापूर व वर्धा,
०४. जिल्हा कोषागार अधिकारी, भंडारा, चंद्रपूर, धुळे, जालना, लातूर, नांदेड, नाशिक, उस्मानाबाद, परभणी, सांगली, सातारा, सोलापूर व वर्धा,
०५. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
०६. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
०७. महालेखापाल -एक (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
०८. महालेखापाल -दोन (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
०९. विधी व न्याय विभाग कार्यासन-२३,२४,२५,
१०. निवडनस्ती.